सन २०१८-२०१९ या वर्षात राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- अनुदान देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय, क्रमांक: सपस-२०१८/प्र.क्र.३६७/२४ स**

मंत्रालय, विस्तार, मुंबई-३२

दिनांक: २६ डिसेंबर, २०१८

**संदर्भ**:- १) मंगळवार, दिनांक ११ डिसेंबर,२०१८ रोजीचा मंत्रिमंडळ निर्णय

२) गुरुवार, दिनांक २० डिसेंबर,२०१८ रोजीचा मंत्रिमंडळ निर्णय

**प्रस्तावना:-**

चालू वर्षी राज्यातील अपुऱ्या पावसामुळे कांद्याच्या उत्पादनावर परिणाम झालेला आहे. तसेच कर्नाटक, गुजरात व राजस्थान इत्यादी शेजारील राज्यामध्ये कांद्याचे उत्पादन चांगले झाले असल्याने, उत्तर व दक्षिण भारतातून नियमितपणे असणाऱ्या कांद्याच्या मागणीमध्ये घट झालेली आहे. परिणामी बाजारात कांद्याचा अपेक्षित प्रमाणात उठाव होत नाही. माहे नोव्हेंबर २०१८ मध्ये राज्यातील कांद्याची आवक असलेल्या प्रमुख बाजार समित्यांमध्ये कांद्याचे भाव अचानक कमी होऊन शेतकऱ्यांना त्यांचा कांदा अत्यल्प दरात विकावा लागला आहे. याबाबत वृत्तपत्रे, दूरचित्रवाणी व सोशल मिडीयावर मोठ्या प्रमाणात बातम्या प्रसिद्ध होऊन राष्ट्रीय स्तरावर कांद्यांच्या घसरलेल्या भावामुळे संकटात सापडलेल्या शेतकऱ्यांना आर्थिक सहाय्य करण्याची मागणी निर्माण झाली होती. त्याचप्रमाणे शेतकरी, शेतकरी संघटना, स्थानिक लोकप्रतिनिधी यांचेकडूनदेखील कांदा उत्पादकाना दिलासा देण्याची मागणी पुढे येत होती. यासंदर्भात मंगळवार, दिनांक ११.१२.२०१८ च्या मंत्रीमंडळ बैठकीत चर्चा होऊन कांदा उत्पादक शेतकऱ्यांना सहाय्य करण्यासाठी उपाययोजना करण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत.

माहे नोव्हेंबर,२०१८ पासून खरीप व रब्बी हंगामातील कांद्याची राज्यातील प्रमुख बाजार समित्यांमध्ये मोठ्या प्रमाणात आवक होत होती. या कालावधीत सर्वसाधारणपणे कांद्यासाठी रुपये २५० ते रुपये ९०० प्रति क्विंटल प्रमाणे अत्यल्प बाजार भाव मिळत होते. मागील वर्षी या कालावधीत कांद्याचे दर रुपये २६००- रुपये २७०० प्रति क्विंटल इतके होते. तसेच, शेतकऱ्यांना कांद्याचे उत्पादन घेण्यासाठी येणारा प्रति क्विंटल खर्च विचारात घेता, राज्यातील कांदा उत्पादक शेतकऱ्यांना आर्थिक मदत देण्याच्या दृष्टीने दिनांक १ नोव्हेंबर २०१८ ते दिनांक १५ डिसेंबर, २०१८ या कालावधीत राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समितीमध्ये कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना अनुदान देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णयः-**

राज्यातील कृषी उत्पन्न बाजार समित्या/खाजगी बाजार समितीमध्ये दिनांक १ नोव्हेंबर २०१८ ते दिनांक १५ डिसेंबर,२०१८ या कालावधीत कांदा विक्री केलेल्या शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.

ही योजना राबविण्यासाठी निश्चित केलेल्या अटी व शर्ती पुढीलप्रमाणे आहेत :-

i. कांदा उत्पादक शेतकऱ्यांना प्रति क्विंटल रुपये २००/- व जास्तीत जास्त २०० क्विंटल प्रति शेतकरी याप्रमाणे अनुदान मंजूर करण्यात येईल.

ii. सदर अनुदान Direct Bank Transfer द्वारे शेतकऱ्यांच्या बचत बँक खात्यात जमा केले जाईल.

iii. ही योजना जे शेतकरी १ नोव्हेंबर २०१८ ते १५ डिसेंबर २०१८ या कालावधीत सर्व बाजार समितीमध्ये कांदा विक्री करतील त्यांचेसाठी लागू राहील.

iv. तसेच प्रसन्ना कृषी मार्केट,पाडळी आळे, जि. अहमदनगर या खाजगी बाजार समितीमध्ये कांदा विक्री केलेल्या कांदा उत्पादक शेतकऱ्यांनाही या अनुदानाचा लाभ अनुज्ञेय आहे.

v. कृषी उत्पन्न बाजार समिती, वाशी, नवी मुंबई वगळता राज्यातील सर्व बाजार समित्यांसाठी ही योजना राबविण्यात यावी.

vi. परराज्यातून आवक झालेल्या व व्यापाऱ्यांच्या कांद्यासाठी ही योजना लागू राहणार नाही.

vii. कांदा उत्पादक शेतकऱ्यांनी या योजनेखाली अनुदान मिळण्यासाठी कांदा विक्री पट्टीसह, ७/१२ चा उतारा, आपले बँक बचत खाते क्रमांक इ. सह साध्या कागदावर ज्या बाजार समितीकडे कांदा विक्री केलेली आहे तेथे अर्ज करावा.

viii. शेतकऱ्यांना अनुदान प्राप्त करुन देण्याचे प्रस्ताव हे संबंधीत बाजार समितीने तयार करावेत. प्रस्ताव तयार करण्याची संपूर्ण जबाबदारी बाजार समितीची राहील. सदरचे प्रस्ताव तालुका सहाय्यक निबंधक, सहकारी संस्था यांनी तपासून ते जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांचेकडे सादर करावेत. जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था यांनी योग्य प्रस्तावांना मंजूरी दिल्यानंतर ती यादी पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना सादर करावी. पणन संचालनालयामार्फत संबंधित जिल्हा उपनिबंधकांना निधी वितरीत करण्यात येईल.

ix. या योजनेची योग्य पध्दतीने अंमलबजावणी करण्यासाठी संबंधित बाजार समितीचे सचिव, तालुका सहाय्यक निबंधक /उपनिबंधक, सहकारी संस्था व जिल्हा उपनिबंधक,

सहकारी संस्था हे या योजनेचे नियंत्रक म्हणून कामकाज पाहतील व त्यासाठी ते जबाबदार राहतील.

x. ज्या प्रकरणात ७/१२ उतारा वडीलांच्या नावे व विक्रीपट्टी मुलाच्या व अन्य कुटूंबियांच्या नावे आहे व ७/१२ उताऱ्यावर पिक पाहणीची नोंद आहे, अशा प्रकरणात वडील व मुलगा वा अन्य कुटूंबीय यांनी सहमतीने उपरोक्त ix मध्ये नमूद समितीकडे शपथपत्र सादर केल्यानंतर ७/१२ उतारा ज्यांच्या नावे असेल त्यांच्या बँक बचत खात्यामध्ये अनुदान जमा केले जाईल.

२. या योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या सर्व प्रस्तावांची छाननी करुन जिल्हानिहाय पात्र लाभार्थ्यांची यादी तयार करण्याची कार्यवाही पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्वरीत करावी व बाजार समितीनिहाय लाभार्थी व अनुज्ञेय अनुदान यांची एकत्रित माहिती शासनास ३० दिवसांत सादर करावी.

३. योजनेसाठी आवश्यक निधी उपलब्ध करुन देण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यात येईल.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.mharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१२२६१५३३०२१५०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Anoop Kumar
Date: 2018.12.26 15:41:45 +05'30'

**(अनूप कुमार)**
**प्रधान सचिव (पणन)**
**सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबारहिल, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (सहकार, पणन व वस्त्रोद्योग) मंत्रालय, मुंबई
४. मा.राज्यमंत्री (पणन) मंत्रालय, मुंबई
५. मा. सर्व मंत्री व राज्य मंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. मा. राज्यमंत्री ( पणन ) यांचे मंत्रालय, मुंबई

७. मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.अ.मु.स. ( वित्त ) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे
१०. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११. कार्यकारी संचालक,महाराष्ट्र राज्य कृषी पणन मंडळ, पुणे
१२. सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
१३. सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था
१४. अध्यक्ष/सचिव, कृषि उत्पन्न बाजार समिती (सर्व)
१५. महालेखापाल, महाराष्ट्र-१ /२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा ), मुंबई/नागपूर,
१६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१७. वित्त विभाग, व्यय-२/अर्थसंकल्प-११, मंत्रालय, मुंबई-३२
१८. अवर सचिव, १७ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई,
१९. निवड नस्ती २४ स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.